मुंबईमध्ये "स्काय बस मेट्रो" प्रकल्प राबविण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.एमआरडी-२०००/१२५२/प्र.क्र.१११/२०००/नवि-१०,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च,२००१.

**प्रस्तावना :-** मुंबई महानगरी महाराष्ट्राची राजधानी व देशाची आर्थिक राजधानी आहे. मुंबईची लोकसंख्या १ कोटीहून अधिक आहे. महानगरातील सुमारे ४०% नागरिक कामधंद्यानिमित्ताने नियमित दैनंदिन ये-जा करीत असतात. दैनंदिन प्रवासी वाहतूकीसाठी सध्या उपनगरीय रेल्वे सेवा व मुंबई विद्युत व परिवहन उपक्रमाची बस सेवा उपलब्ध आहे. वाहनांची रहदारी सुकर होण्याच्या दृष्टीने महामार्गांवर महत्वाच्या ठिकाणी उड्डाणपूल बांधण्यात येत आहेत. यामुळे काही प्रमाणात वाहनांच्या रहदारीतील अडथळे कमी होणार असले तरी काही अत्यंत वर्दळीच्या मार्गांवर रहदारीची कोंडी होण्याचा प्रश्न शिल्लक रहाणार आहे. यासाठी आर्थिकदृष्ट्या किफायतशीर व पर्यावरणदृष्ट्या योग्य अशा सार्वजनिक प्रवासी वाहतूक योजनेची आवश्यकता आहे. या पार्श्वभूमीवर कोंकण रेल्वे महामंडळाने "स्काय व्हील्स" ही नवीन संकल्पना विकसीत केली असून त्यावर आधारित "स्काय बस मेट्रो" हे एक नवीन तंत्रज्ञान विकसीत केले आहे. कोंकण रेल्वेने तयार केलेल्या या संबंधीचा प्राथमिक अहवाल शासनास सादर केला. त्या संबंधी शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

अ) मुंबईमध्ये "स्काय बस मेट्रो" प्रकल्प राबविण्यास तत्वतः मान्यता देण्यात येत आहे.

ब) उक्त प्रकल्पासाठी समन्वयन व कार्यान्वयन संस्था म्हणून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची नियुक्ती करण्यात येत आहे.

(कृ.मा.प.)

GR - 20020129931903800

00

क) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने कोकण रेल्वे महामंडळाशी सामंजस्यता करार करुन कोकण रेल्वे महामंडळाने सूचविलेल्या विभिन्न मार्गापैकी प्राधिकरणाची कार्यकारी समिती ठरवेल अशा एका मार्गाचा तांत्रिक व आर्थिकदृष्टया सुसाध्यता अहवाल तयार करुन या प्रकल्पाच्या व्यवहार्यतेबाबत ठोस प्रस्ताव तीन महिन्यांत शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( पां. वि. धाडगे )
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

प्रति,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

प्रधान सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

प्रधान सचिव ( परिवहन ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

प्रधान सचिव-१/२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.

व्यवस्थापकीय संचालक, कोकण रेल्वे महामंडळ, तिसरा मजला, बेलापूर भवन, सेक्टर-११, सी.बी.डी .बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४.

महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे - कुर्ला संकुल मुंबई- ४०० ०५१.

आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका ,मुंबई-४०० ००१.

पोलिस आयुक्त( वाहतूक), मुंबई

महाव्यवस्थापक, मुंबई विद्युत पुरवठा व परिवहन उपक्रम ,मुंबई.

परिवहन आयुक्त, प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, शासकीय वसाहत, वांद्रे (पुर्व ) ,मुंबई-४०० ०५१.

GR - 2002 09 29 93 703C000 - 0600